# महाराष्ट्र शासन

क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.६/ कराधान-३
वित्त विभाग,
मंत्रालय मुख्य इमारत,
५ वा मजला, बजेट हॉल,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक - ३१ डिसेंबर, २०२१

<u>**संदर्भ**</u>:- (१) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही २००४/ प्रक्र. १५/४/१२ दि. २५/०५/२००६

(२) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र. पीओडी १००७/ प्रक्र ९/ १८(र.व का.) दि. १४/११/२०१३

(३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. संकीर्ण २०१२/ प्रक्र. ५४/ १८ (र. व का.) दि. ११/०८/२०१४

(४) वित्त विभाग, कार्यालयीन आदेश क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.०६/कराधान-३,दि. ०७/०३/२०१८

## कार्यालयीन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हा राज्यात लागू करण्यात आलेला आहे. या अधिनियमातील कलम ९(२) नुसार प्रत्येक कार्यालयाचा किंवा विभागाचा प्रमुख त्या कार्यालयाशी संबंधित सर्व बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने त्या सादर करण्यासाठी शक्यतो अधिका-यांचे तीन स्तर निर्धारित करील अशी तरतूद आहे.

२. त्याअनुषंगाने कराधान-०१, कराधान- ०२ आणि कराधान- ०३ कार्यासनाशी संबंधित विषयाच्या बाबतीत सोबतच्या विवरणपत्र दर्शविल्याप्रमाणे निर्णय घेण्यासाठी सादरीकरणाचे स्तर निश्चित करण्यात येत आहेत. तथापि, वरिष्ठ अधिका-याचे निर्देश असल्यास किंवा काही अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे योग्य तो बदल करण्यात येईल. तसेच धोरणात्मक बाबींच्या प्रकरणात दिनांक ११ ऑगस्ट, २०१४ च्या परिपत्रकात नमूद केल्यानुसार तीनपेक्षा अधिक स्तर असतील.

३. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२११२३११६३३३४६८०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mandar Ashok Kelkar

Digitally signed by Mandar Ashok Kelkar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=500b03a2acf8670cbc3af82871445df8c6c5862fbed7679822233103ec4e8926, pseudonym=642BBB7ACDF63B41604A454A3975AC69E04A2D82, serialNumber=DC44279B721C6B725B0DB2B28A9A9ACEB0719B69B051F7861850C8129F723861, cn=Mandar Ashok Kelkar
Date: 2021.12.31 16:37:36 +05'30'

**( मंदार केळकर )**
उप सचिव, वित्त विभाग

**प्रत,**

(१) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहाय्यक
(२) उपसचिव (प्रशासन),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
(३) अवर सचिव (प्रशा-०२), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
(४) निवडनस्ती कराधान-०१/ ०२/०३.

**कार्यालयीन आदेश क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र.०६/कराधान-३, दिनांक ३१/१२/२०२१ सोबतचे विवरणपत्र.**

शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ९(२) अनुसार कार्यासनाशी संबंधित बाबींवर अंतिम निर्णय होण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करण्याबाबत अधिकाऱ्यांचे तीन स्तर निश्चित करणे.

| अ.क्र. | कराधान-१<br>कार्यासनात हाताळले जाणारे विषय | सादरीकरणाचे तीन स्तर | | | अंतिम निर्णय घेण्यास सक्षम प्राधिकारी | आदेश निर्गमित करण्यास सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|---|---|---|---|
| | | प्रथम | द्वितीय | तृतीय | | |
| १. | वस्तू व सेवा कर अधिनियम, २०१७, केंद्रीय विक्रीकर अधिनियम, १९५६, कार्यकंत्राट कर अधिनियम, १९८९, भाडेकरार कर अधिनियम, १९८५, मूल्यवर्धित कर अधिनियम, २००२ या अधिनियमांचे तसेच या अधिनियमांखालील नियमांचे सुधारणांचे प्रस्ताव. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | मा.मंत्री (वित्त) | उप सचिव (कराधान) |
| २. | वर १ मध्ये उल्लेख केलेल्या अधिनियमाखालील आणि त्यांचे संबंधीत असलेल्या नियमाखालील निर्गमित करावयाच्या अधिसूचना. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | मा.मंत्री (वित्त) | उप सचिव (कराधान) |
| ३. | वरील अधिनियमाखालील कराची थकबाकी संबंधीचे सांख्यिकी तपशील गोळा करणे आणि त्याचे संकलन करणे व ही माहिती पुरविणे. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | अ.मु.स. (वित्त) | उप सचिव (कराधान) |
| ४. | वरील अधिनियम व त्याखालील नियम अद्यावत करुन त्याचे मुद्रण करुन घेणे. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | अ.मु.स. (वित्त) | उप सचिव (कराधान) |
| ५. | परिषदा बैठका आणि पश्चिम क्षेत्रिय वस्तू व सेवाकर विषयक समिती इत्यादी. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | मा.मंत्री (वित्त) | उप सचिव (कराधान) |
| ६. | सामूहिक प्रोत्साहन योजनेसंबंधीची प्रकरणे. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | मा.मंत्री (वित्त) | उप सचिव (कराधान) |
| ७. | आपले सरकार / P.G. Portal प्रणालीद्वारे प्राप्त संदर्भ. | का. अ. / स.क.अ. | उपसचिव (कराधान) | ---- | ---- | उपसचिव (कराधान) |

**कार्यालयीन आदेश क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र.०६/कराधान-३, दिनांक ३१/१२/२०२१ सोबतचे विवरणपत्र.**

शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ९(२) अनुसार कार्यासनाशी संबंधित बाबींवर अंतिम निर्णय होण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करण्याबाबत अधिकाऱ्यांचे तीन स्तर निश्चित करणे.

| अ.क्र. | कराधान-२<br>कार्यासनात हाताळले जाणारे विषय | सादरीकरणाचे तीन स्तर | | | अंतिम निर्णय घेण्यास सक्षम प्राधिकारी | आदेश निर्गमित करण्यास सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|---|---|---|---|
| | | प्रथम | द्वितीय | तृतीय | | |
| १. | कराधान-१ व कराधान-२ कडे सोपविलेल्या विषयानुसारच्या अधिनियमाखालील करांच्या दरातील सवलती किंवा माफी मागण्यांबाबतचे सर्व प्रकारचे संदर्भ. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | मा.मंत्री (वित्त) | उप सचिव (कराधान) |
| २. | कराधान-१, कराधान-२ व कराधान-३ कडे सोपविलेल्या विषयानुसारच्या अधिनियम व संबंधीत नियमांच्या अनुषंगाने असलेल्या सर्व प्रकारच्या वैधानिक बाबी म्हणजेच विधान सभा/परिषद, आश्वासने, लक्षवेधी सूचना, अर्धातास चर्चा, संसद सदस्य प्रश्न, विधान मंडळाचे ठराव. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | मा.मंत्री (वित्त) | उप सचिव (कराधान) |
| ३. | वरील १) प्रमाणेच अधिनियम व त्याखालील नियम अद्यावत करुन त्यांचे मुद्रण करुन घेणे.<br>कराधान-१ व कराधान-२ कडे सोपविलेल्या सर्व अधिनियमाखालील करासाठी काढावयाच्या प्रशासकीय सवलती किंवा प्रशासकीय सहाय्य. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | मा.मंत्री (वित्त) | उप सचिव (कराधान) |
| ४. | कर चुकवेगिरीबाबतच्या तक्रारी व कर चुकवेगिरी शोधून काढल्याबद्दल बक्षिसे देण्याची योजना. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | मा.मंत्री (वित्त) | उप सचिव (कराधान) |
| ५. | कर आकारणी किंवा कर परतावा मंजूर करण्याबाबतीत झालेल्या विलंबाच्या तक्रारी. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | अ.मु.स. (वित्त) | उप सचिव (कराधान) |
| ६. | कर विषयक आकडेवारीचे संकलन करणे. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | अ.मु.स. (वित्त) | उप सचिव (कराधान) |
| ७. | विक्रीकर विभागाचे संगणकीकरण. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | अ.मु.स. (वित्त) | उप सचिव (कराधान) |

**कार्यालयीन आदेश क्र. संकीर्ण-२०१८/प्र. क्र.६/ कराधान-०३ दिनांक ३१/१२/२०२१ सोबतचे विवरणपत्र.**

शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ९ (२) अनुसार कार्यासनाशी संबंधित बाबींवर अंतिम निर्णय होण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करण्याबाबत अधिका-यांचे तीन स्तर निश्चित करणे.

| अ.क्र. | कराधान-३<br>कार्यासनात हाताळले जाणारे विषय | सादरीकरणाचे तीन स्तर | | | अंतिम निर्णय घेण्यास सक्षम प्राधिकारी | आदेश निर्गमित करण्यास सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|---|---|---|---|
| | | प्रथम | द्वितीय | तृतीय | | |
| १.<br>(अ) | Professional Tax<br>व्यवसाय कर कायदा, १९७५ व त्याखालील नियम, यामध्ये सुधारणा, या अधिनियमांन्वये निर्गमित करावयाच्या अधिसूचना, अधिसूचनेमध्ये सुधारणा करणे / त्यांना अद्ययावत करणे. | कार्यासन अधिकारी | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | मा.मंत्री (वित्त) | उपसचिव (कराधान) |
| (ब) | व्यवसाय कर माफ करण्याबाबत विविध विभागाकडून प्राप्त होणारे अनौपचारिक संदर्भ / प्रस्ताव. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | ----- | ----- |
| २.<br>(अ) | Sugarcane Purchase Tax<br>ऊस खरेदी कर कायदा, १९६२ व नियम, अधिसूचना यासंबंधित बाबी. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | मा.मंत्री (वित्त) | उपसचिव (कराधान) |
| (ब) | ऊस खरेदी कराच्या अनुषंगाने सहकार विभाग, ऊर्जा विभाग यांचेकडून प्राप्त होणारे अनौपचारिक संदर्भ / प्रस्ताव | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | ---- | ----- |
| (क) | ऊस खरेदी कर रकमेची तसेच रकमेवरील व्याजाची/ शास्तीची परतफेड करण्यासाठी समान मासिक हप्ते मंजूर करण्याबाबत राज्यातील विविध सहकारी साखर कारखान्यांकडून प्राप्त होणारे प्रस्ताव. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | मा. मंत्री (वित्त)/मा.मुख्यमंत्री | उपसचिव (कराधान) |
| ३.<br>(अ) | Chit Fund Act<br>चिटफंड कायदा, १९८२ व चिटफंड नियम, २००४ अन्वये निर्गमित करावयाच्या अधिसूचना व अधिसूचनेमधील सुधारणा करणे / त्यांना अद्ययावत करणे. | कार्यासन अधिकारी | उप सचिव (कराधान) | प्र.स./ अ.मु.स. (वित्त) | मा.मंत्री (वित्त) | उपसचिव (कराधान) |
| (ब) | चिटफंड कायदा, १९८२ व चिटफंड नियम, २००४ अन्वये सहनिबंधक, चिट्स यांचे निवाडयाविरुध्द शासनाकडे प्राप्त होणारी अपीले. | का. अ. / स.क.अ. | उप सचिव (कराधान) | ------ | मा. राज्यमंत्री (वित्त) | मा.राज्यमंत्री (वित्त) |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ४. | **मोटार स्पिरीट कायदा.**<br>मोटार स्पिरीट कायदा, १९५८ , त्याखालील नियम, अधिसूचना यासंबंधित बाबी | का. अ. /<br>स.क.अ. | उप सचिव<br>(कराधान) | प्र.स./<br>अ.मु.स.<br>(वित्त) | मा.मंत्री (वित्त) | उपसचिव (कराधान |
| ५. | विक्रीकर विभागामार्फत हाताळल्या जाणाऱ्या कर विषयक प्रकरणांतील न्यायालयीन बाबी अंतर्गत रिट याचिका, विशेष अनुमती याचिका / दावे दाखल करणे, वकीलांची नियुक्ती करणे तसेच अपीले, न्यायालयीन निर्णयांचे परिक्षण, पुनर्विचार इ. | का. अ. /<br>स.क.अ.. | उप सचिव<br>(कराधान) | प्र.स./<br>अ.मु.स.<br>(वित्त) | प्रधान सचिव<br>(विधी व न्याय विभाग) | उपसचिव<br>(कराधान) |
| ६. | राज्याच्या मागासलेल्या क्षेत्रातील उद्योगांना लागू केलेल्या प्रोत्साहन योजनांमधील विक्रीकर/केंद्रीय विक्रीकर व इतर सर्व कायद्याखाली सवलती संबंधीची प्रकरणे आणि (B.I.F.R.) आजारी कारखाने सहायक योजना. | का. अ. /<br>स.क.अ. | उप सचिव<br>(कराधान) | प्र.स./<br>अ.मु.स.<br>(वित्त) | मा.मंत्री<br>(वित्त)/मा.मुख्यमंत्री | उपसचिव<br>(कराधान) |
| ७. | भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या महसूली-जमा अहवालातील राज्यकर विभागाशी संबंधित परिच्छेदांची स्पष्टीकरणात्मक-ज्ञापने महालेखापाल कार्यालयाकडून vetting करुन घेणे व ती लोकलेखा समितीला सादर करणे. | का. अ. /<br>स.क.अ. | उप सचिव<br>(कराधान) | प्र.स./<br>अ.मु.स.<br>(वित्त) | ----- | ----- |
| ८. | माहितीचा अधिकार. | का. अ. /<br>स.क.अ. | उप सचिव<br>(कराधान) | ---- | कार्यासन<br>अधिकारी/उपसचिव<br>(कराधान) | कार्यासन<br>अधिकारी/उपसचिव<br>(कराधान) |